श्रम सुविधा पोर्टल व निरीक्षण योजनेचा अभ्यास करून अहवाल सादर करण्यासाठी समिती गठित करणे.

## महाराष्ट्र शासन

**उद्योग, उर्जा व कामगार विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक -श्रसुपो-०१/२०१५/प्र.क्र.२८ /कामगार-१०**

मंत्रालय, मुंबई-४०००३२

दिनांक :- २३ जानेवारी, २०१५

**प्रस्तावना :**

दि.१६.१०.२०१४ रोजी मा. प्रधानमंत्री महोदयांच्या हस्ते श्रम सुविधा पोर्टल व लेबर इंस्पेक्शन स्कीम कार्यान्वीत झाली असून श्रम सुविधा पोर्टलद्वारे , उद्योगांना कामगार कायद्याचे पालन करणे सोयीचे व्हावे या दृष्टीने सिंगल ऑनलाईन रिटर्न भरण्याची सुविधा उपलब्ध करून देण्यात आली आहे. यामध्ये आस्थापनांना युनिक लेबर आयडेंटिफिकेशन नंबर देण्यात येणार आहे. निरीक्षण योजना (Inspection scheme) पारदर्शक करण्यात येवून याद्वारे अंमलबजावणी यंत्रणेच्या स्वैर कार्यवाहीवर निर्बंध ठेवण्यात येणार असून ती अधिक जबाबदार होण्याच्या दृष्टीने प्रयत्न करण्यात येणार आहे. निरीक्षण अहवाल ७२ तासांच्या आत पोर्टलवर अपलोड करणे बंधनकारक करण्यात आले आहे. याद्वारे उद्योग सुरू करण्यास सुध्दा सहायता मिळणार आहे. तसेच यामध्ये वेळीच्या वेळी तक्रारींचे निवारण करण्याची सुविधा सुध्दा उपलब्ध करून देण्यात आली आहे.

याच विषयावर सर्व राज्यांच्या कामगार मंत्र्यांच्या बैठकीमध्ये झालेल्या चर्चेमध्ये ब-याच राज्यांनी जानेवारी ते मार्च, २०१५ या कालावधीत या वेब पोर्टलशी संलग्न होण्यास तयारी दर्शविली आहे. सदर पोर्टल व इंस्पेक्शान स्कीमला संलग्न होण्याच्या दृष्टीने राज्यांनी कार्यवाही/कृती निश्चित करणे आवश्यक असून त्या प्रमाणे निश्चित कार्यक्रम आखण्याबाबत व वेब पोर्टलशी संलग्नतेबाबत इच्छूकता कळविण्याबाबत श्रम व रोजगार मंत्रालयाद्वारे सुचना देण्यात आल्या आहेत. त्या अनुषंगाने कामगार विभागाची सद्यस्थिती व श्रम सुविधा पोर्टल व लेबर इंस्पेक्शान स्कीमशी संलग्न होण्याच्या दृष्टीने विभागांतर्गत करावयाची कार्यवाही याचा अभ्यास करण्यासाठी समिती स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

श्रम सुविधा पोर्टल व लेबर इंस्पेक्शान स्कीमशी संलग्न होण्याच्या दृष्टीने विभागाची सद्यस्थिती व विभागांतर्गत करावयाची कार्यवाही याचा अभ्यास करण्यासाठी खालीलप्रमाणे समिती गठीत करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे :-

| | | |
|---|---|---|
| कामगार आयुक्त, मुंबई | - | अध्यक्ष |
| सह सचिव (कामगार), उद्योग, उर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई. | - | सदस्य |
| संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय, मुंबई | - | सदस्य |
| संचालक, बाष्पके, मुंबई | - | सदस्य |
| श्री.अ.खु.पेंडसे, कामगार उप आयुक्त,मुंबई | - | सदस्य |
| श्री. अ. रा. लाकसवार, कामगार उप आयुक्त, नागपूर | - | सदस्य |
| श्री. विलास बुवा, कामगार उप आयुक्त, मुंबई | - | सदस्य सचिव |

सदर समिती खालील मुद्यांच्या अनुषंगाने अभ्यास करेल.

१. माहितीचे संगणकीकरण करणे.
२. राज्य निरीक्षण योजना अधिसूचीत करणे.
३. ऑनलाईन वार्षिक विवरणपत्रे एक खिडकीद्वारे भरण्यासाठी नियमात सुधारणा करणे.
४. निरीक्षण अहवालाच्या सुलभीकरणासाठी नियमात सुधारणा करणे.
५. निरीक्षणासाठी निवड करण्याचे निकष तयार करणे.
६. सेंट्रल ॲनालिसीस ॲण्ड इंटेलिजेंस युनिट स्थापन करणे.
७. अंमलबजावणीसंदर्भात तक्रार निवाराण यंत्रणा अधिसूचीत करून ती निरीक्षण योजनेशी संलग्न करणे.

सदर समिती वरील मुद्दांच्या अनुषंगाने अभ्यास करून १५ दिवसांत प्राथमिक अहवाल सादर करेल. तसेच सविस्तर अहवाल व शिफारसी दोन महिन्यात शासनास सादर करेल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashstra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१५०१२३१५२९१७२७१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ajit Madhukarrao Baviskar

Digitally signed by Ajit Madhukarrao Baviskar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industry Energy & Labor, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Ajit Madhukarrao Baviskar
Date: 2015.01.23 15:39:08 +05'30'

**(अ.म.बाविस्कर)**
कार्यासन अधिकारी

**प्रत,**

१. मा. मंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव.
२. मा. राज्यमंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव.
३. प्रधान सचिव (कामगार) यांचे स्विय सहायक.
४. कामगार आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५. सह सचिव (कामगार), उद्योग, उर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय, मुंबई
७. संचालक, बाष्पके, मुंबई.
८. श्री. अ. रा. लाकसवार, कामगार उप आयुक्त, नागपूर.
९. श्री. अ.खु.पेंडसे, कामगार उप आयुक्त, कामगार आयुक्त कार्यालय, मुबई.
१०.श्री. विलास बुवा, कामगार उप आयुक्त, कामगार आयुक्त कार्यालय, मुबई.
११.निवड नस्ती (कामगार -१०)